**सन २००४-२००५ या शैक्षणिक वर्षात बारावी इयत्तेत असलेल्या व यापूर्वीच बारावी इयत्ता उत्तीर्ण झालेल्या मागासवर्गीय (अनु. जमाती वगळून) विद्यार्थ्यांच्या जातीच्या प्रमाणपत्राची तपासणी मुदतवाढ**

**महाराष्ट्र शासन**

समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग,
शासन निर्णय क्रमांक सीबीसी १० /२००५ / प्र.क्र. ४७ / मावक ५
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०००३२
दिनांक : १९ मे, २००५

वाचा :- १) शा.नि. स.क.सां.का. व क्री.विभाग क्र.सीबीसी-१६९४/४०१२४/प्र.क्र.९५६/मावक-५, दिनाक २६.डिसेंबर १९९४

२) शा.नि. स.क.सां.का.व क्री.विभाग क्र. सीबीसी-१९६९४/प्र.क्र.९५६/मावक ५, दिनाक १६ मार्च १९९८

३) शा.नि.स.क.सां.का.व क्री. विभाग, सीबीसी-१६९८/प्र.क्र.२६६/मावक ५, दिनांक ८, ऑक्टोबर १९९८

४) शा.नि.वि.जा.भ.ज.इ.मा.व.व वि.मा.प्रवर्ग कल्याण विभाग क्र.सीबीसी -१०९८/१४८५०/प्र.क्र.११८/इमाव ५, दिनांक २०.१२.१९९९

५) शा.नि.वि.जा.भ.ज.इ.मा.व.व वि.मा.प्रवर्ग कल्याण विभाग क्र.सीबीसी-२०००/२५२/ प्र.क्र.१/इमाव ५, दिनांक २५.१.२०००

६) शा.नि.सा.न्या.सां.का. क्री. व वि.स.विभाग क्र.सीबीसी १०/२००४/प्रक्र ३१७/मावक-५, दिनाक ७.६.२००४

७) शा.नि.सा.न्या.सां.का. क्री. व वि.स.विभाग क्र.सीबीसी १०/२००४/प्रक्र ३१७/मावक-५, दिनाक ७.७.२००४

८) शा.नि.सा.न्या.सां.का. क्री. व वि.स.विभाग क्र.सीबीसी १०/२००४/प्रक्र ३१७/मावक-५, दिनाक २९.९.२००४

**प्रस्तावना**:- सन २००४-२००५ या शैक्षणिक वर्षामध्ये विज्ञान शाखेच्या इयत्ता अकरावी व बारावी मध्ये शिकत असलेल्या तसेच यापूर्वी बारावी इयत्तेत विज्ञान शाखेत उत्तीर्ण झालेल्या सर्व अनुसूचित जाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग आणि विशेष मागासप्रवर्गाच्या विद्यार्थ्यांच्या जाती प्रमाणपत्राची वैधता तपासण्यासाठी संबंधित शैक्षणिक संस्थांकडे व जिल्हा समाजकल्याण अधिकरी यांच्याकडे अर्ज करण्याची अंतिम मुदत दिनांक ३० ऑक्टोबर, २००४ अशी होती. तथापि २००४-२००५ या शैक्षणिक वर्षात इयत्ता बारावीमध्ये शिकत असलेल्या तसेच यापूर्वीच्या काळात बारावी इयत्तेत उत्तीर्ण झालेल्या काही मागासवर्गीय विद्यार्थ्यांनी वरील निर्धारित मुदतीत अर्ज सादर केले नसल्याने किंवा अपरिहार्य कारणामुळे त्यांना ते शक्य झाले नसल्याने, अशा विद्यार्थ्यांची केवळ त्यांच्या जाती प्रमाणपत्राची तपासणी न झाल्यामुळे त्यांचे शैक्षणिक

वर्ष वाया जाऊ नये म्हणून मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत सर्वंकष विचार करुन शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-** सन २००४-२००५ या शैक्षणिक वर्षात इयत्ता बारावी विज्ञान शाखेत शिकत असलेल्या तसेच यापूर्वी इयत्ता बारावी विज्ञान शाखेत उत्तीर्ण झालेल्या अनुसूचित जाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग आणि विशेष मागासप्रवर्गाच्या विद्यार्थ्यांनी दिनांक ३०.१०.२००४ पर्यंत विहित मुदतीत जाती प्रमाणपत्राच्या तपासणीसाठी अर्ज सादर केले नाहीत. त्यांच्यासाठी संदर्भाधीन क्रमांक ८ येथील शासन निर्णयान्वये दिनांक ३०.१०.२००४ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. तथापि, अद्यापही ब-याच विदयार्थ्यांचे जात प्रमाणपत्रे समितीकडे पाठविणे बाकी असल्याने व त्याबाबत शासनाकडे विद्यार्थी व लोकप्रतिनिधी यांचेकडून विचारणा होत असल्याने सन २००५-२००६ या शैक्षणिक वर्षात वैद्यकिय, अभियांत्रिकी, वास्तुशास्त्र व औषध निर्माणशास्त्र या अभ्यासक्रमासाठी प्रवेश घेऊ इच्छितात अशा विद्यार्थ्यांनी आपल्या जाती प्रमाणपत्राची पडताळणी करुन घेण्यासाठी खालील प्रमाणे मुदतवाढ देण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| १) विद्यार्थ्यानी इ.१२ वी उत्तीर्ण केली आहे त्या महाविद्यालयामार्फत आपले अर्ज संस्थेच्या प्राचार्यांकडे सादर करावयाचा अंतिम दिनांक | **दि. ३१ ऑगस्ट, २००५** |
| २) शिक्षण संस्थेने त्यांच्याकडे प्राप्त झालेले अर्ज संबंधित जात प्रमाणपत्र पडताळणी समितीकडे पाठविण्याचा अंतिम दिनाक | **दि. १५ सप्टेंबर, २००५** |
| ३) समितीने अर्ज तपासून द्यावयाचा अंतिम दिनांक | **दि. ३१ ऑक्टोबर, २००५** |

**जातीची प्रमाणपत्रे तपासून देण्याबाबत यापुढे मुदतवाढ दिली जाणार नाही**.

२. शासन असेही आदेश देत आहे की, जर या उशीरा आलेल्या अर्जापैकी काही विद्यार्थ्यांचा जातीचा दावा संशयास्पद असल्याने दावा तपासण्यास उशीर झाला व पर्यायाने संबंधित विद्यार्थ्यास वैद्यकीय, अभियांत्रिकी, वास्तुशास्त्र व औषधी निर्माण शास्त्र या अभ्यासक्रमासाठी महाविद्यालयात पुढील शैक्षणिक वर्षामध्ये पदवी अभ्यासक्रमासाठी प्रवेशाबाबत काही अडचणी निर्माण झाल्यास, अथवा **प्रवेश मिळू शकला नाही तर त्याची जबाबदारी जाती प्रमाणपत्र तपासणी समितीवर अथवा शासनावर रहाणार नाही असे संबंधित विद्यार्थ्यांकडून लेखी घेऊन नंतरच असे अर्ज तपासणीसाठी स्विकारावेत.**

३.	माहिती व जनसंपर्क महासचालनालयाने या शासन निर्णयास राज्यस्तरावरील प्रमुख दैनिके, जिल्हा स्तरीय /स्थानिक दैनिके, आकाशवाणी व दूरदर्शनवरुन प्रसिध्दी देण्याची व्यवस्था करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( ना. ना. भडीकर )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य,पुणे
सर्व अतिरिक्त आयुक्त (महसूल), जाती प्रमाणपत्र पडताळणी समिती, मुंबई, पुणे, नाशिक, नागपूर, औरंगाबाद व अमरावती
सहसंचालक (जा.प्र.त.) समाजकल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
विभागीय साजकल्याण अधिकारी (जा,प्र.प.स.) मुंबई, पुणे, नाशिक, नागपूर, औरंगाबाद, व अमरावती
सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी
संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
संचालक,वैद्यकीय शिक्षण व संशोधन,मुंबई
संचालक, तंत्र शिक्षण, मुंबई
संचालक, आयुर्वेद संचालनालय, वरळी, मुंबई
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय,मंत्रालय, मुंबई

प्रत :-

प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.

त्यांना विनंती करण्यात येते की, **त्यांनी त्यांच्या अधिपत्याखालील सर्व शैक्षणिक संस्थांना वरील विद्यार्थ्यांचे जाती प्रमाणपत्र पडताळणीचे अर्ज स्विकारुन आवश्यक त्या प्रमाणपत्रांसह संबंधित जाती प्रमाणपत्र समितीकडे विहित मुदतीत अर्ज सादर करण्याच्या सूचना तात्काळ निर्गमित कराव्यात. तसेच या सूचना वेबसाईट वर सुध्दा त्यांच्या स्तरावरुन प्रसिध्द कराव्यात.**